# परंपरा, नवता आणि त्यांचा परस्परसंबंध

## वसंत पळशीकर

"परंपरेंतील कांही शाश्वत मूल्यांचा आपणाला विसर पडूं लागला आहे, प्रभावी ठरू पाहणाऱ्या नवतेमध्ये कांही अनिष्ट गोष्टी अंतर्भूत झालेल्या आहेत किंवा परंपरा आणि नवता यांच्यामधील संबंधाविषयीची एखादी चुकीची कल्पना बद्धमूल होऊं लागली आहे" अशा ‘कोणत्या तरी जाणिवे’ने अस्वस्थचित्त होऊन आपण 'ललित वाङ्मयांतील परंपरा आणि नवता' या विषयाच्या तत्त्वचर्चेला सिद्ध झाल्याचे आपल्या व्याख्यानाच्या प्रारंभी प्रा. करंदीकर सांगतात.

'परंपरा' या कल्पनेचा प्रा. करंदीकरांचा अर्थ प्रारंभींच्या अवतरणांतून स्पष्ट व्हावा. परंपरेंतल्या कांही शाश्वत मूल्यांचा विसर पडूं लागला असल्याची ते नोंद करतात. 'कांही'मध्ये समाविष्ट न झालेली इतर शाश्वत मूल्येहि परंपरेंत असतात असें त्यांतून सूचित होतें. मूल्यें शाश्वत आहेत असें म्हटलें की सुष्ट आहेत असे वेगळें म्हणायला नको. तसेंच त्यांचें त्रिकालाबाधित प्रामाण्य स्वयंसिद्धच मानायला हवें. परंपरेंत अशीं शाश्वत मूल्ये असतात त्याअर्थी परंपरा सुष्ट असली पाहिजे.

या वैचारिक टप्प्यावरून 'मूल्यगर्भ व गतिशील चैतन्यावस्था म्हणजे परंपरा' येथपर्यंतची मजल सोपी आहे. बुद्धीने थोडी हातचलाखी केली म्हणजे झालें. (याबाबतीत मात्र प्रा. करंदीकरांच्या बुद्धीने त्यांना भरपूर साथ दिल्याचे आढळतें.) अशी परंपरा "चोखंदळपणे स्वतःशीं सुसंगत असलेल्या गोष्टींची निवड करीत असते, न रुचणारे नाकारीत असते," हे अर्थात् ओघानेच आलें.

अशा अनाद्यंत सर्वकालप्रमाणित सुष्ट एकेरी परंपरेच्या संदर्भात आपण 'नवता' म्हणतों त्या घटना (कलाकृति) या 'नाकारलेल्या' घटनांचाच एक खास विभाग असला पाहिजे; किंवा परंपरेंतल्या एका भागाला कांही विशिष्ट कारणांकरता 'नवता' असें म्हणायला हवें. तर्कदृष्ट्या तिसरा विकल्प उरत नाही. प्रा. करंदीकरांनी दुसरा अर्थ स्वीकारला आहे असे आढळतें, म्हणजे असा अर्थ काढतां येईल, अशा प्रकारचीं कांही विधाने ते करतात. इथेहि त्यांच्या बुद्धीने हातचलाखी केलेली आहेच. एकच उदाहरण पुरेसें आहे : "परंपरांतर्गत घटकांच्या मूल्यमापनांत बदल घडवून आणणारा व आपले विशिष्ट ऐतिहासिक कार्य संपत असतांनाच परंपरेशी एकरूप होऊन तिला समृद्ध करणारा अनिवार्य उन्मेष म्हणजे नवता.”

त्यांच्या विवेचनांतून 'नवते'चे तीन अर्थ मी काढू शकलों ते असे : (१) परंपरेंत समाविष्ट करतां येण्याइतक्या वयस्क न झालेल्या घटना; (२) सतत विकसत जाणाऱ्या वर्तुळाकार पुनरावृत्तीतले सर्वात आंतलें वलय; (३) क्रियाप्रतिक्रियेच्या न्यायाने चालणाऱ्या विरोधविकासांतले एक टोक हे तीनहि अर्थ नवतेला 'जुने आणि नवें', 'कालचें आणि आजचें' या कालगतीच्या अटळ चक्रांत बंदिस्त करून टाकतात.

अनाद्यंत सर्वकालप्रमाणित सुष्ट एकेरी परंपरेची प्रा. करंदीकरांची कल्पना वस्तुनिष्ठतेच्या कसोटीवर टिकणारी नाही.

राजकीय इतिहासाचें एक क्षेत्र घेतलें तरी ही कल्पना क्षणभरहि टिकूं शकत नाही असें दिसतें. एरवी राज्यकारभाराचे अनेक प्रकार - लोकशाहीपासून तों सर्वकष सत्तावादापर्यंत - एकाच परंपरेला समृद्ध करणारे नवतेचे अनिवार्य उन्मेष आहेत असें म्हणण्याची व सिद्ध करण्याची आपत्ति येते.

एकेरी परंपरेची कल्पना सोडली की त्यांची परंपरेला समृद्ध करून तिच्याशी एकरूप होणाऱ्या नवतेची कल्पनाहि मान्य करणें अशक्य होतें. कारण परंपरेशी एकरूप न होतां नवता आपली एक स्वतंत्रच परंपरा निर्माण करूं शकते, ही संभाव्यता उघडच आहे. आणि प्रत्यक्ष अनुभवांत असें आढळतेंहि. एरवी मानवी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत वैचित्र्य व विरोध या गोष्टींचा खुलासा होऊं शकत नाही.

अगदी तात्त्विकदृष्ट्या विचार केला तरी त्यांच्या परंपरेच्या कल्पनेला तर्काचा आधार सापडत नाही. ती एक निव्वळ कपोलकल्पना आहे. दुर्दैव असे की तिच्यांत 'फँटसी' (fantasy) किंवा 'मिथ' (myth) यांच्यामध्ये आढळणारें सत्यहि नाही. कारण ती सुसंगतहि नाही. त्यांची नवतेची कल्पना केवळ एक पडछाया आहे. निर्जीव व आशयशून्य.

प्रा. करंदीकरांच्या विवेचनांतील विसंगति, अर्थशून्य विधानें आणि हातचलाखी यांचे कांही नमुने पुढीलप्रमाणे- त्यांतूनहि त्यांचें म्हणणें अधिक "स्पष्ट" व्हावें! :

प्रा. करंदीकरांचें विवेचन सुसंगत नाही. परंपरा ही चैतन्यावस्था भूतकालीन घटनांनी निर्माण केलेली असते असें म्हणणें यांतच विसंगति आहे. वास्तविक आधी चैतन्यावस्था, कारण ती घटनांना निर्माण करूं शकते, पण घटना चैतन्यावस्था निर्माण करूं शकत नाहीत. समजा, घटना चैतन्यावस्था निर्माण करतात. आजपर्यंतच्या सर्व घटना मिळून चैतन्यावस्था निर्माण करतात का? 'आज' चीं तारीख-वार-सन, घटिका-पळें-वेळ कोणती? कारण ही परंपरा निवड करीत असते असे प्रा. करंदीकरांनीच पुढे म्हटलें आहे. समजा, हेंहि आपण पचवून घेतलें. 'नाकारलेल्या' घटनांचे काय होते? त्या नाही का कांही निर्माण करीत? त्याहिपेक्षा पुढे जाऊन प्रश्न पडतो - अशा चोखंदळ परंपरेच्या संदर्भात 'नवता' या शब्दाला कांही अर्थ आहे काय? इत्यादि.

ही झाली विसंगतीची तऱ्हा. याशिवाय अर्थशून्य अशा विधानांची पखरणहि मुक्तहस्ताने केलेली आढळते. उदाहरणार्थ :

१. मानवी जीवनाच्या विशिष्ट अशा एकात्म क्षेत्रांतील भूतकालीन घटनांनी निर्माण केलेली मूल्यगर्भ व गतिशील चैतन्यावस्था म्हणजे परंपरा.

२. परंपरेंत घटनांचें नुसतें कार्यकारणबद्ध एकत्रीकरण नसतें, तर हेतुदर्शक एकात्मीकरण असतें.

३. परंपरा "घडत असतांना" ज्याचा प्रत्यय येतो ती नवता आणि नवता “आत्मसात् केल्यावर” जी मागे उरते ती परंपरा.

(बहुधा प्रा. करंदीकरांच्याहि नकळत झालेल्या) बौद्धिक हातचलाखीचीं कांही उदाहरणें देतों : गतिशील चैतन्यावस्थेला 'spiritual momentum' असा प्रतिशब्द प्रा. करंदीकर वापरतात. इंग्रजी शब्दप्रयोगाचा अर्थ

आध्यात्मिक वस्तुबल/गतिमानता असा होतो. हातचलाखीचें याहून अधिक समर्पक उदाहरण क्वचित् सापडेल.

"मूल्यगर्भ व गतिशील चैतन्यावस्था म्हणजे परंपरा" या व्याख्येप्रत जाणारी प्रत्येक पायरी पाहा. परंपरेंत शाश्वत मूल्ये असतात. असे सर्वसाधारण विधान वास्तविक होऊं शकत नाही. परंपरेंत मूल्यें (समाविष्ट) असतात इतपतच विधान ठीक आहे. 'मूल्ये' आणि 'शाश्वत मूल्ये' यांतल्या मूलभूत भेदावर पांघरूण पडण्यांत चलाखी आहे. परंपरेंत मूल्ये असतात या म्हणण्यांत अनाद्यंत एकच परंपरा चालते असें सूचित करायचे नसतें. सर्वच परंपरांचा एक सामान्य गुणधर्म आपण सांगत असतो. परंपरेंत शाश्वत मूल्ये असतात या म्हणण्यांतून अनाद्यंत एकच (शाश्वत मूल्यांची) शाश्वत परंपरा असा अर्थ काढण्यांत चलाखी आहे. विशिष्ट परंपरा माणसांत चैतन्य निर्माण करूं शकते या अनुभव - निरीक्षणांतून 'विशिष्ट' आणि 'माणसांत' हीं दोन पर्दे वगळून परंपरा व चैतन्यावस्था यांचे समीकरण मांडणें यांतहि पुष्कळच चलाखी आहे.

नवतेसंबंधीचें त्यांचें वर एके ठिकाणीं दिलेलें व्याख्यात्मक विधान पाहा. परंपरांतर्गत घटकांच्या मूल्यमापनांत बदल घडवून आणण्याचा अर्थ व्याख्यानांत कोठेच स्पष्ट केलेला नाही. अशा स्पष्टतेअभावीं विधान अर्थपूर्ण नाही असेंच म्हणावें लागतें. पण प्रथमदर्शनीं एक अत्यंत कूट प्रश्न काय 'सुंदर' सोडवला आहे असें वाटायला लावणारें हैं विधान आहे.

ललित वाङ्मयांतील परंपरा व नवता, व त्यांच्यांतील परस्परसंबंध यासंबंधी कांही सांगण्याआधी परंपरा व नवता या दोन बौद्धिक कल्पनांसंबंधी थोडा खुलासा करण्याची आवश्यकता आहे.

मानवी जीवनांत हेतु व संगति शोधण्याच्या मानवाच्या अनिवार्य ऊर्मीचाच परंपरेचा शोध हा एक पैलू आहे. सुसंवादी मूल्यांच्या अनुषंगाने निवड करून घटनांचे गट पाडणें (कांही वेळां घटनांमधील कांही अंगावर अधिक भर देऊन त्यांचे गट पाडणें), ही परंपरा या बौद्धिक रचनेची (intellectual construct) कार्यपद्धति. म्हणून इतिहासाचा थोडा विपर्यास केल्याशिवाय परंपरेची बांधणी शक्य होत नाही. परंपरेंत दिसणारें कालसातत्य म्हणून अर्धसत्य व भ्रामक असतें.

मानवी जीवनांत हेतुविकासाचें, संगतीचें सनातन मूल्यविचारांचें अस्तित्वच नाकारण्याची वैचारिक भूमिका घेतली जाऊं शकते. अशा भूमिकेच्या दृष्टीने परंपरा ही कल्पनाच विवाद्य आहे. तात्पर्य असें की, परंपरेचा आशय, व्याप्ति या गोष्टी व्यक्तिसापेक्ष आहेत. (परंपरेच्या कांही विशिष्ट बांधणी सार्वत्रिक मान्यता पावतात म्हणून व्यक्तिसापेक्षतेकडे दुर्लक्ष केलेले व्यवहारांत खपून जातें, इतकेंच.)

परंपरा या कल्पनेला दोन 'अप्रोचेस' आहेत. एक, प्राधान्यतः, विश्लेषणात्मक व अन्वयार्थात्मक बौद्धिक कल्पना म्हणून परंपरेकडे पाहणें, हा दुसरा, कृतीला चालना देणारी, तीवर दडपण आणणारी, तिला बंदिस्त करणारी एक शक्ति किंवा प्रभाव म्हणून परंपरेचा अनुभव करणें, हा.

(१) ज्या कोणत्या मानवी प्रवृत्तिक्षेत्राला इतिहास आहे त्या क्षेत्रांतील इतिहासाचा (कालानुक्रमाने मांडलेल्या घटना या अर्थाने) अभ्यास करीत असतांना परंपरेचा (किंवा परंपरांचा) आढळ होतो; किंबहुना विशिष्ट अर्थाने संपृक्त परंपरा -- कल्पना - मनांत आकार घेतात. इथे या कल्पनांचे कार्य इतिहासांत व्यवस्था लावण्याचें, इतिहासांत एका अर्थाने संश्लेषण साधण्याचें, असें दुहेरी असतें.

(२) व्यवहारांत परंपरेची जाणीव होते ती वेगळ्या प्रकारची. तिथे माणसांच्या कृतींच्या, विचारांच्या संदर्भात परंपरेचा उल्लेख होतो. भूतकालीन घटनांच्या अवलोकनाच्या संदर्भात नाही.

"परंपरेला शोभणारे नाही", "परंपरेला विरोधी आहे", "परंपरा फार प्रबल आहे", किंवा "परंपरा सुटत चालली" अशा प्रकारचीं विधानें आपण ऐकतों. कांही माणसांना आपण एका परंपरेंत कार्य करीत असल्याची, किंवा एखाद्या परंपरेच्या विरोधी कार्य करीत असल्याची जाणीव असते. आपण आपला, तसेंच इतरांचा संबंध एका विशिष्ट रीतीने भूतकालाशीं जोडीत असतो.

तीन गोष्टींचा आपण विशेषत्वाने निर्देश करीत असतों : (१) आपल्या कृति- विचारांचें, मूल्य श्रेणीचें पुराणत्व; (२) हें ज्ञान, श्रद्धा, तत्त्वें, चालीरीती, संस्था इत्यादिकांच्या आदानप्रदानाची (transmission) रीत; आणि (३) पुराणत्व आणि आदानप्रदानाची रीत या दोन्हींमुळे या गोष्टींची आपल्या आचारविचारावर, मानसावर असलेली पकड.

सगळ्याच वेगवेगळ्या परंपरांना सामान्य असलेले कांही गुणधर्म आपण सांगूं शकत असलों तरी सौंदर्य, सद्-असद्, सत्य यांप्रमाणे परंपरा है मूल्यतत्त्व नाही. विशिष्ट आशयाच्या संदर्भातच परंपरेची एक active, dynamic मूल्यगर्भ कल्पना म्हणून कल्पना केली जाऊं शकते. तिथे परंपरा हा शब्द विशिष्ट आशयाचे एक सर्वमान्य चिन्ह म्हणूनच वापरला जात असतो. ती केवळ एक सोय आहे. व्यवहारांत परंपरा या शब्दाचा वापर या मर्यादितच होत असल्याने संभाषण बहुधा उभयपक्षीं स्पष्ट असतें. पण ज्या क्षणीं उभयपक्षीं आशयाची एकवाक्यता नसते तेथे त्या परंपरेचा प्रत्येकाच्या मनांतील विशिष्ट आशय स्पष्ट करावा लागतो. बहुधा त्या शब्दाचा आश्रय चर्चेकरता घेतां येत नाही.

परंपरा म्हणजे काय या प्रश्नाचें एक उत्तर असें कांहीसें येतें : पिढ्यानपिढ्या संस्कारांच्या द्वारा प्रदान केल्या जाणाऱ्या गोष्टी; पुराणत्वाने लोकमानसांत प्रामाण्य पावलेल्या गोष्टी. इथे भर गोष्टींवर नाही, तर त्यांच्या इतर वैशिष्ट्यांवर आहे.

याच प्रश्नाला दुसऱ्या प्रकारचें उत्तर असें येतें : विशिष्ट ऐतिहासिक घटनागटांत समाविष्ट असलेल्या मूल्यें, तत्त्वज्ञान, श्रद्धा, इत्यादींच्या समुच्चयाला उद्देशून वापरला जाणारा समूहवाचक शब्द.

पहिल्या उत्तरांत सातत्याची कल्पना अधिक महत्त्वाची आहे. पण हें सातत्य अनाद्यंत काल टिकणारें असतें असा अनुभव नाही. ही सातत्याची कल्पना फक्त लगतच्या भूतकालाबद्दलच प्रस्तुत असते. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर, इतिहासाचा संपूर्ण काळ विचारांत घेतला तर खंडित व नष्ट झालेल्या परंपरा आठवतात. परंपरेंत जाणवणाऱ्या सातत्याचें, गतिमानतेचें रहस्य परंपरा ज्या रीतीने प्रदान केली जाते त्या रीतींत आहे हेंहि लक्षांत यावें.

आणखी एक असेंहि लक्षांत यावें की, कोणत्याहि एका काली बहुधा एकाहून अधिक परंपरा अस्तित्वांत असतात. त्यांत प्रभावाच्या कसोटीवर अव्वल, दुय्यम असा भेद करतां येतो.

परंपरेंत मूल्ये समाविष्ट असतात. तीं मूल्यें शाश्वत किंवा सुष्ट असतातच असें नाही, तसेंच हा एक वाक्प्रयोग आहे. आपण मूल्यांच्या एका समुच्चयाला इतर कांही गुणधर्मापुढे परंपरा म्हणतों असें खरें त्याचें स्पष्टीकरण सतत ध्यानांत ठेवायला हवें.

नवतेचे चार प्रकार करतां येतील, प्रत्येक प्रकारच्या 'नवते'करता परंपरेचा विचार थोडासा वेगळ्या दृष्टिकोनांतून करावा लागेल :

(१) कोणत्याहि काली एक परंपरा प्रभावी व अव्वल असते, व बाकीच्या दुय्यम तिय्यम असतात. कोणती परंपरा त्यांतल्या त्यांत अधिक प्रभावी आहे हैं वस्तुनिष्ठदृष्ट्या ठरविणें शक्यतेच्या कोटींतलें आहे. या प्रभावी परंपरेला पदच्युत करून तिची जागा घेतली जाण्याच्या प्रक्रियेत प्रभावी ठरलेल्या घटनांना नवता म्हणतां येईल:

( २ ) इतिहासाचा अभ्यास करीत असतांना पूर्वीच्या अभ्यासकांनी केलेल्या परंपरांच्या बांधणींतील सदोषता उजेडांत आणून परंपरांच्या नवीन रचना केल्या गेल्यास त्या नव्या रचनांना उद्देशून नवता हा शब्दप्रयोग वापरणें;

(३) त्या विशिष्ट क्षेत्रांतील तत्कालीन सर्व परंपरांहून भिन्न पण व्यापक सांस्कृतिक परंपरेशीं (किंवा वातावरणाशीं) विरोधी नसलेल्या नवीन घटनांना नवता म्हणणें;

(४) तत्कालीन व्यापक सांस्कृतिक परंपरेलाच (त्या विशिष्ट क्षेत्रांतील सर्वच तत्कालीन परंपरांनाहि) मूलतः विरोधी असलेली नवता.

यांपैकी केवळ शेवटच्या अर्थानेच नवतेची कल्पना करणें मला स्वतःला योग्य वाटतें.

नवतेच्या या प्रकारच्या व्याख्येत कांही गृहीतकृत्ये आहेत, तशाच कांही मर्यादा (qualifications) आहेत. मर्यादा अशा : एक तर नवतेची एक सदासर्वकाल प्रमाण अशी व्याख्या करण्याचा प्रयत्न नाही. आपल्या जीवनांतील घटनांवर थोडा अधिक प्रकाश टाकण्याच्या दृष्टीने अशा सक्त मर्यादित सर्वसाधारण व्याख्यांचा उपयोग करतां येतो, तेवढ्यापुरतेंच या व्याख्येला हाताशीं धरायचें.

गृहीतकृत्ये अशीं : मानवाच्या सगळ्याच विशिष्ट क्षेत्राला रंगरूप देणारे असें एक व्यापक सांस्कृतिक वातावरण सर्वच काळांत असतें. या वातावरणांत सर्वसाधारणतः एक प्रभावी परंपरा असते.

त्या प्रभावी परंपरेंतील आशय (मूल्ये, श्रद्धा, रीतिरिवाज, दंतकथा, इत्यादि) तत्कालीन बहुसंख्य वैचित्र्यपूर्ण, विरोधी विशिष्ट परंपरांना आपल्या पोटांत सामावून घेत असतो. म्हणजेच परंपरांत अशी श्रेणी लावली जाऊं शकते. अशा सांस्कृतिक परंपरेचा प्रभाव दीर्घ काळ - कांही शतकें - टिकणारा असतो.

कालांतराने अशा प्रभावी सांस्कृतिक परंपरेला आव्हान देणाऱ्या घटना अस्तित्वांत येतात. या घटनांचा या परंपरेवर मूलेकुठारः आघात होतो. परंपरा खंडित होते. सांस्कृतिक वातावरण निराळेंच होतें. जुन्या सगळ्याच गोष्टी नाहीशा होतात असे नाही. सर्वसामान्य माणसाच्या वैश्विक दृष्टिकोनांतच (world view) मूलगामी बदल होतो. हा बदल उलटवितां येत नाही. या बदलाचें प्रतिबिंब मानवी जीवनाच्या इतर क्षेत्रांत पडतें. हा बदल प्रथम कांही विशिष्ट क्षेत्रांत प्रकट होतो आणि अधिकाधिक प्रवृत्तिक्षेत्रे काबीज करीत जातो असें म्हणणें योग्य होईल. अशा बदलाला उद्देशून नवता हा शब्द वापरणें अधिक अर्थपूर्ण होईल.

कोणतीहि नवता फार काळ त्या नांवाने ओळखली जाऊं शकत नाही, कारण कालांतराने त्या नांवावर आपला हक्क सांगणाऱ्या घटना पुढे येतात. तेव्हा असें झालें म्हणजे नवता परंपरेशी एकरूप झाली असें म्हणावयाचें का? असा घोटाळा प्रा. करंदीकरांनी केला आहे. वास्तविक दोन वेगवेगळ्या अनुभवांचे मिश्रण झाल्याने असा घोटाळा झाला असावा.

नवता या शब्दाचे उघडच दोन अर्थ आहेत (नावीन्य हा अर्थ वगळून). एक अर्थ कालवाचक आहे, दुसरा आशयवाचक आहे. ज्या घटना केवळ कालाच्या दृष्टीने नव्या असतात त्या कालांतराने जुन्या होतात. त्या परंपरेशीं कधीच विरोधी नव्हत्या; त्याच परंपरेंतील पण नव्या वर्तमानकालीन घटना इतकेंच सूचित करायचें असतें. आशयांतील वेगळेपणामुळे ज्या घटनांना नवता असे आपण म्हणूं त्या जुन्या झाल्या तरी पूर्वीच्या परंपरेंत दाखल होत नाहीत. या वेगळ्या घटना कांही काळं सातत्याने घडत राहिल्या तर त्यांचीच एक निराळी परंपरा तयार होते. म्हणून प्रत्येक परंपरा ही विशेष नांवाने ओळखली जाते. हा सामान्य अनुभव अर्थपूर्ण आहे.

ललित वाङ्मयाच्या संदर्भात परंपरा आणि नवता यांचा विचार वरीलपेक्षा फारसा निराळा नाही. मात्र ललित वाङ्मयाचें स्वरूप लक्षांत घेतां परंपरा व नवता या दोन्ही कल्पना अधिक tenuous होतात. कारण वेगवेगळ्या कलाकृतींना केवळ ढोबळ अर्थानेच परंपरेच्या चौकटींत बसवितां येईल. एखाद्या विशिष्ट उद्दिष्टाच्या पूर्तीत मदतरूप म्हणून असें वर्गीकरण तात्पुरतें करणें लाभदायी ठरत असतें. पण तीच या कल्पनांच्या उपयुक्ततेची ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांतील मर्यादा.

ललित वाङ्मय है अंतिमतः मानवाबद्दल व मानवीय दृष्टींतून जगाबद्दल कांही सांगत असतें. या दोन्ही गोष्टी सनातन आहेत. या क्षेत्रांतील ज्ञानाचा विकास हा शोधस्वरूपी (of the nature of a discovery) आहे. एका अर्थी विकास आपल्याच जाणिवेचा होत असतो. वस्तु तीच, पण प्रत्येक वेळेस आपली त्या वस्तूसंबंधीची जाणीव वेगळी वेगळी, पण सर्वस्वी नवीन नाही.

ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांत नव्या वाङ्मयाने जुनें वाङ्मय बाद ठरत नाही. सर्वच वाङ्मय समकालीन असतें. म्हणून परंपरा व नवता या कल्पना फार मर्यादित अर्थाने लागू होतात.

प्रत्येक अस्सल कलाकृति तिच्या संपूर्ण स्वरूपांत विचारांत घेतली असतां परंपरा या कल्पनेलाच छेद देणारी असते असें म्हणायला हवें. तिच्या कांही वैशिष्ट्यांना वेगळे करून मग तेवढ्यापुरतें तिला परंपरेंत बसवितां येईल, किंवा ती नवीन आहे असें म्हणतां येईल.

या दोन overriding मर्यादांची जाणीव ठेवून ललित वाङ्मयांतील परंपरा आणि नवता या विषयाचा विचार करावयाचा झाल्यास वर उल्लेखिलेल्या नवतेच्या चौथ्या प्रकाराने करतां येईल. तिथे परंपरा या शब्दाने लगतच्या भूतकाळांत सर्वच वाङ्मयांतील वेगवेगळ्या विशिष्ट 'परंपरां'चें अधिष्ठान असलेलें व्यापक सांस्कृतिक वातावरण सूचित केलेलें असतें. या सांस्कृतिक वातावरणाला पदच्युत करण्यांत पुढाकार घेणाऱ्या घटनांना उद्देशून नवता हा शब्द वापरलेला असतो.

एकाच कालांत समाजांत बहुधा एकच सांस्कृतिक परंपरा प्रभावीपणे कार्य करीत असते. त्यामुळे त्या काळच्या बव्हंशी सर्वच ललित वाङ्मयांत एक सर्वसाधारणपणे समान जीवनदृष्टि व मूल्यविचार आढळतो. या एका समान जीवनदृष्टीची व मूल्यविचाराची अभिव्यक्ति अनेकपदरी असते. या प्रत्येक पदराला स्वतंत्र परंपरा मानतां येईल का हे वेगवेगळ्या समाजांतील ललित वाङ्मयांचे इतिहास तपासून पाहिल्यावरच अधिक स्पष्ट होईल.

ललित वाङ्मयांतील परंपरा ही कलाकृतींत अभिव्यक्त होणाऱ्या जीवनदृष्टीची, मूल्यविचारांची परंपरा असा अर्थ केला तर वर उल्लेखिलेली अडचण बरीचशी दूर होते. प्रत्येक लेखकाचें व्यक्तिमत्त्व 'अपूर्व' असले, कलाकृतींची संख्या व प्रकार या दोन्ही गोष्टी असंख्य असल्या, तरी बहुधा सर्व लेखक एकाच सांस्कृतिक परंपरेंत कार्य करीत असतात. त्यामुळे समकालीन प्रभावी लेखकांच्या लेखनांत समान मूल्यविचार व जीवनदृष्टि आढळते. वाङ्मयीन परंपरेच्या दृष्टीने एका कालखंडांतील प्रभावी लेखक एकाच परंपरेंत कार्य करीत असतात असे आढळतें.

कांही कारणांनी प्रचलित सांस्कृतिक परंपराच संशयास्पद ठरते, तिचे प्रामाण्य नाकारलें किंवा या सांस्कृतिक परंपरेच्या स्पर्श नसलेल्या (out of the pale of society and tradition) घटनांनी परंपरेचा तोल बिघडतो. या क्रांतीचें मूळ कधी बदलत्या सामाजिक, आर्थिक, धार्मिक, राजकीय किंवा यांपैकी संमिश्र कारणांनी बदलणाऱ्या परिस्थितींत असेल; कधी महायुद्धासारखा एखादा प्रलयकारी अनुभव, कधी फ्रॉइडच्या मानसशास्त्रीय सिद्धांतासारखा स्फोटक विचार यांच्यांत असेल.

समाजाचें जातींत किंवा वर्गात साचेबंद विभाजन झालेलें असतें अशा समाजांत पुष्कळ वेळां कांही नाती किंवा वर्ग सांस्कृतिक परंपरेच्या 'बाहेर' (out the pale of society and tradition) राहून जातात. कधी त्याचा परिणाम म्हणून समाजांत दोन भिन्न परंपरा अस्तित्वांत असतात, त्यांचा परस्परांशी संबंध जवळपास नसतो. 'नीच' श्रेणींची सांस्कृतिक परंपरा 'काव्यशास्त्रे - कलां'च्या दृष्टीने क्षीण व 'मूक' असते. असे वर्ग किंवा अशा जाती आपल्या दैनंदिन जीवनांतून स्वतंत्र सांस्कृतिक परंपरा निर्माण करतात; ही परंपरा मग प्रतिष्ठित सांस्कृतिक परंपरेवर आक्रमण करून तिला पार बदलून टाकते. कधी क्षीण व 'मूक' परंपरा एकाएकीं बहरतात, समर्थ बनतात, त्यांना कंठ फुटतो. त्यामुळे

प्रतिष्ठित सांस्कृतिक परंपरा बदलते. कधी एका सांस्कृतिक परंपरेची जगांतल्या अन्य सांस्कृतिक परंपरेशी गाठ पडते.

सांस्कृतिक परंपरेंत क्रांतिकारक बदल घडून येत असल्याच्या पहिल्या खुणा अशाच वेगवेगळ्या कालांत भिन्न भिन्न क्षेत्रांत प्रथम प्रकट झाल्या आहेत.

शेवटी एक मूलभूत शंका उपस्थित करून ही लांबण आटोपती घेतों :

नवता हा शब्द नवकथा, नवकविता, नवनाट्य या शब्दप्रयोगांपासून उचललेला आहे. नव या पदाचा अर्थ नवीन असा न करतां आधुनिक असा करणें अधिक योग्य आहे. आधुनिक (modernist) हा शब्द विशेष कालखंडाला उद्देशून वापरला जातो. या 'नव'कलावंताच्या कलादृष्टि व कलामूल्ये या दोन्ही गोष्टी वेगळ्या आहेत, विशेष आहेत. ललित कलांच्या क्षेत्रांत हा काल एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपासून पुढचा धरला जातो. मराठी वाङमयाच्या क्षेत्रांत मर्ढेकरांच्या 'कांही कवितां'च्या नंतरचा काळ हा आधुनिक म्हटला जातो. ही 'आधुनिक' क्रांति काव्य, कथा व नाट्य या तीन प्रकारांत झालेली आढळते. पण हें कांहीच लेखकांच्या बाबतींत खरें आहे. मराठी ललित वाङ्मयाच्या दृष्टीने विचार करतां परंपरा विरुद्ध आधुनिकता ( modernism ) अशी समस्येची फेरमांडणीदेखील त्यामुळे सर्व वाङ्मयाला उद्देशून वस्तुनिष्ठ ठरत नाही. 'परंपरा व नवता' ही प्रा. करंदीकरांची मांडणी तर साफ विषयांतर आहे. (हे त्यांच्या उपोद्घातावरून स्पष्ट व्हावें.)

आधुनिकता हा कालवाचक शब्द नाही. तो एका जीवनदृष्टीला उद्देशून वापरला जात असलेला विशेषणवाचक शब्द आहे. पण आधुनिकतेच्या आशयासंबंधी किंवा त्यांतून प्रकट झालेल्या रूप व शैली यांच्यांतील नवीन प्रकारांसंबंधी लिहिण्याचें हें स्थळ नाही.